**वस्तू व सेवाकर भवन, पुणे येथील नवीन इमारतीतील फर्निचरच्या कामासाठी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहरित करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२१/प्र.क्र.८१/वि.प्र.४**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
नवीन प्रशासकीय इमारत, ३ रा मजला,
मुंबई -४०० ०३२
दिनांक- २०/१०/२०२१

**वाचा :-** वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. विकवि-१४१५/प्र.क्र.११९/वि.प्र.४, दि. ११/०७/२०१७

**शासन निर्णय :-**

वस्तू व सेवाकर भवन, पुणे येथील नवीन प्रशासकीय इमारतीमधील फर्निचरच्या कामासाठी महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाद्वारे करुन घेण्याकरिता रु.२,००,००,०००/- (रुपये दोन कोटी फक्त) इतके अनुदान सन २०२१-२०२२ या वित्तीय वर्षातील खर्च भागविण्यासाठी मंजूर करण्यात आले आहे. सदर अनुदानापैकी वस्तू व सेवाकर भवन, पुणे येथील नवीन इमारतीतील फर्निचरच्या कामासाठी रु.२०,००,०००/- (अक्षरी रुपये वीस लक्ष फक्त) इतका निधी कोषागारातून आहरित करण्यासाठी मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त बाबींवरील खर्च " मागणी क्र.जी-८, मुख्य लेखाशीर्ष ४०७०-इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च (००) ८००, इतर खर्च (००) (००) (०१)". महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाद्वारे विक्रीकर कार्यालयाच्या इमारतीचे बांधकाम (कार्यक्रम), ५३ मोठी बांधकामे ( ४०७० ०२४९ ) " या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२०२२ या वित्तीय वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२५७१/अ.मु.स. (नियोजन) दि. ०७/०९/२०२१ तसेच वित्त विभागाच्या व्यय-७ शाखेच्या अनौपचारीक संदर्भ क्र.५८७/२०२१/ व्यय-७ दिनांक. २१/०९/२०२१ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०२०१४५४५१८२०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Manjusha Salvi
Digitally signed by Manjusha Salvi
DN: CN = Manjusha Salvi, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Finance Department
Date: 2021.10.20 15:00:40 +05'30'

**( मंजुषा साळवी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) राज्यकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, वस्तू व सेवाकर भवन, मुंबई-४०० ०१०
२) विशेष राज्यकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, वस्तू व सेवाकर भवन, मुंबई-४०० ०१०
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य-१ मुंबई
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
५) वित्त विभाग, कक्ष अधिकारी (प्रशा-४/अर्थसंकल्प-१२/व्यय-७)
६) निवडनस्ती.